अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मगास प्रवर्गातील असलेल्या ज्या उमदेवारांनी जातीचा दावा करुन निवडणुक लढविली आहे अशा उमेदवारांच्या जातीच्या दाव्याची पडताळणी सध्या अस्तिवात असलेल्या जाती प्रमाणपत्र पडताळणी समितीकडून घेण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन
समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग
शासन निर्णय,क्रमांक:सीबीसी-१०९७/प्र.क्र. २०७/मावक-५.
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १ जानेवारी, १९९८

वाचा :- १) शासन निर्णय,समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य,क्रीडा व पर्यटन विभाग, क्रमांक:सीबीसी-१६८४/गोप/५९२/(१९९९)/बीसीडब्ल्यू-५,दि.१४ मार्च,१९८५.
२) शासन निर्णय,समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्रमांक:सीबीसी-१६९४/४०९२४/प्र.क्र.२५६/मावक-५,दि.२६ डिसेंबर,१९९४.
३) शासन निर्णय,समाजकल्याण,सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग, क्रमांक:सीबीसी-१०९६/प्र.क्र.४८/मावक-५, दि.५ जुलै,१९९७.
४) उप आयुक्त, राज्य निवडणुक आयोग, महाराष्ट्र राज्य, मुबई याचे पत्र क्रमांक : एसईसी -एमएनसी-१९९७/प्र.क्र.२३२/का-३, दिनांक ९ जुलै, १९९७

शासन निर्णय :- वर उल्लेखिलेल्या अनुक्रमांक १ व २ येथील शासन निर्णयान्वये अनुक्रमे संचालक, समाजकल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या स्तरावर जाती प्रमाणपत्र पडताळणी समिती स्थापन करण्यात आलेली आहे. तसेच विभागीय स्तरावर पाच जाती प्रमाणपत्र पडताळणी समित्या अनुक्रमे मुंबई, औरंगाबाद, नागपूर, अमरावती व नाशिक येथे स्थापन करण्यात आलेल्या आहेत, वरील सर्व समित्यांची कर्तव्ये खालीलप्रमाणे आहेत :-

१) ठराविक वैद्यकीय व अभियांत्रिकी महाविद्यालयात पहिल्या वर्षाकरिता प्रवेश घेणा-या मागासवर्गीय विद्यार्थ्यांचे ( अनुसूचित जमाती वगळून) जातीचे प्रमाणपत्र / जातीच्या दाव्याची तपासणी करणे.

२) शासन सेवेत, मागासवर्गीयांची राखीव असलेल्या पदावर नियुक्तीसाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत शिफारस करण्यात आलेल्या मागासवर्गीय उमेदवारांच्या ( अनुसूचित जमाती वगळून ) जातीच्या प्रमाणपत्राची /जातीच्या दाव्याची तपासणी करणे.

३) शासनाच्या समाजकल्याण विभागामार्फत जाती प्रमाणपत्राच्या / दाव्याच्या तपासणी बाबतची सोपविलेली अन्य प्रकरणे तपासणे.

४) जे कर्मचारी अनुसूचित जाती / विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्गामध्ये राखीव असलेल्या पदांवर नियुक्त झाले आहेत अशांचे जाती दावे तपासणे.

५) निवड मंडळामार्फत व प्रादेशिक दुय्यम सेवा मंडळामार्फत राखीव जागेवर शिफारस केलेल्या मागासवर्ग कर्मचा-यांच्या जाती दाव्याची प्रकरणे तपासणे.

६) या पूर्वी अमागासवर्ग म्हणून शासन सेवेत प्रवेश केला आहे व त्यानंतर एखाद्याची जात मागासवर्ग म्हणून घोषित केले आहे व मागास म्हणून त्यांना असलेल्या आरक्षणाचा फायदा घेणे इच्छित असल्यास अशा उमेदवारांच्या जाती दाव्याची प्रकरणे तपासणे.

७) महाराष्ट्र राज्यातील जे कर्मचारी / अधिकारी केंद्र शासनाच्या सेवेत आहेत व त्यांचे जाती दाव्याची तपासणी करावयाची आहे अशाची प्रकरणे तपासण्यासंबंधी तपासावीत.

८) निमशासकीय सेवेत राखीव जागेवर प्रवेश घेतलेले सर्व कर्मचारी / अधिकारी यांच्या जातीचे दाव्यांची तपासणी करणे.

९) एखाद्या उमेदवारांची / कर्मचा-याची पूर्वी अमागासवर्गीय म्हणून शासन सेवेत नियुक्ती झाली असेल व तो आता मागासवर्ग असल्याचा दावा करीत असतील किंवा पूर्वी त्यांचा मागासवर्गाच्या दुस-या वर्गवारीचा दावा करीत आहेत असे असल्यास अथवा त्यांच्या जाती प्रमाणपत्रात नमूद असलेली व शाळा सोडल्याच्या प्रमाणपत्रात नमूद असलेली जात याच्यात तफावत असेल अशा जाती दाव्याची प्रमाणपत्रे तपासणे.

२. स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडणूकांमध्ये अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग यांच्यासाठी काही राखीव ठेवण्यात येतात. सदर जागांवर काही उमेदवार खोटया जातीच्या प्रमाणपत्राच्या आधारे निवडणुक लढवितात असे शासनाच्या निदर्शनास आलेले आहे. त्यामुळे राखीव जागेवर निवडून आलेल्या उमेदवारांच्या जाती प्रमाणपत्राची सत्यता पडताळून पहाणे अनिवार्य झाले आहे अशा खोटया प्रमाणपत्राची पडताळणी करुन घेणे क्रमप्राप्त आहे, त्यासाठी शासन खालील प्रमाणे आदेश देत आहे.

३. स्थानिक स्वराज्य संस्थाच्या निवडणूकीमध्ये अनुसूचित जाती, नागरिकांचा मागासवर्गीयांसाठी (इतर मागासवर्गीय व विमुक्त जाती ) काही जागा राखीव ठेवण्यात येतात. सदर राखीव जागेवर खोटया जातीच्या प्रमाणपत्राद्वारे निवडणूका लढवितात. सदर राखीव जागेवर निवडून आलेल्या उमेदवारांच्या जाती प्रमाणपत्राची सत्यता संबंधित जाती प्रमाणपत्र पडताळणी समिती कडून संबंधित जिल्हाधिकारी यांनी करुन घ्यावी. निवडणूका झाल्यानंतर राखीव मतदार संघातून निवडून आलेल्या सर्व उमेदवारांचे जाती / जमातीचे प्रमाणपत्रे संबंधित जिल्हाधिकारी यांनी संबंधित जाती प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे १५ दिवसाच्या आंत आवश्यक त्या कागदपत्रासह पाठवावीत व संबंधित जाती प्रमाणपत्र पडताळणी समितीने अशा उमेदवारांच्या जाती दाव्याची पडताळणी ४५ दिवसाच्या आंत करुन आपला निर्णय संबंधित जिल्हाधिका-यांकडे न चूकता पाठवावी.

हा शासन निर्णय नगर विकास विभाग तसेच ग्राम विकास विभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही /-
( जे. पी. डांगे )
सचिव, समाजकल्याण,
महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र १-२, मुंबई / नागपूर
सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
मुख्य महानगर दंडाधिकारी
सर्व तालुका कार्यकारी दंडाधिकारी
सर्व विभागीय आयुक्त
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
आयुक्त, आदिवासी कल्याण, महाराष्ट्र राज्य, नाशिक
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
सह संचालक (जाप्रत), समाजकल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी
समाजकल्याण अधिकारी, बृहन्मुंबई, मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग
सचिव, नगर विकास विभाग,
सचिव, ग्राम विकास विभाग
सर्व उप आयुक्त, राज्य निवडणूक आयोग,
मुख्य निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग,

त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदर आदेश त्यांचे अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांचे निदर्शनास आणून द्यावेत.

सर्व कार्यासने, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग